**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांकः** मविसे-११२३/प्र.क्र.४५/आस्था-३ अ
३ रा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई-०१
तारीख: १२ जुलै, २०२३

**वाचा :**

**शासन आदेश, ग्राम विकास विभाग क्रमांकः** समक्रमांक, दिनांक २६ मे, २०२३.

**शासन आदेश :**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व ४ (५) अनुसार उक्त वाचा मधील दिनांक २६ मे, २०२३ रोजीच्या शासन आदेशान्वये, श्री.राजु दादा गर्जे यांची सहायक गट विकास अधिकारी, (ग्रामपंचायत) जिल्हा परिषद, बीड येथून सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती पाथर्डी, जिल्हा अहमदनगर येथे बदली करण्यात आली आहे. श्री.राजु दादा गर्जे, सहायक गट विकास अधिकारी यांना जिल्हा परिषद, बीड येथून अद्याप कार्यमुक्त केलेले नाही.

०२. श्री.राजु दादा गर्जे यांची सहायक गट विकास अधिकारी, (ग्रामपंचायत) जिल्हा परिषद, बीड यांना सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती पाथर्डी, जिल्हा अहमदनगर या पदावर रूजू होण्यासाठी दिनांक १३ जुलै, २०२३ (म.पू.) पासून एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. श्री.गर्जे सहायक गट विकास अधिकारी यांनी इतर कोणत्याही आदेशाची प्रतिक्षा न करता सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती पाथर्डी, जिल्हा अहमदनगर येथे दिनांक १३ जुलै, २०२३ (म.पू.) पासून रूजू व्हावे. सदरचे आदेश हेच कार्यमुक्ततेचे आदेश असून जिल्हा परिषद, बीड यांनी स्वतंत्र आदेश निर्गमित करण्याची आवश्यकता नाही.

०३. संबंधित अधिकारी दिनांक १३ जुलै, २०२३ (म.पू.) पासून बदलीच्या पदावर रूजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास त्यांचेविरूद्ध शिस्तभंग विषयक कार्यवाही करण्यात येईल.

०४. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी तसेच जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय यांना कळविण्यात येते की, उपरोक्त अधिकाऱ्याचे दिनांक ०१ जुलै, २०२३ पासूनचे वेतन कोणत्याही परिस्थितीत पूर्वीच्या जिल्हा परिषदेतून अदा करण्यात येऊ नये अन्यथा त्यांना व्यक्तीशः जबाबदार धरण्यात येईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७११९८००२०५३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

URMILA VAIBHAV JOSHI

Digitally signed by URMILA VAIBHAV JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a6ce46aedb9acea34c72711d852d8e2e71e76603f9082ea9709649c6f45dc30, pseudonym=04E059BEAE068888E7BA44450EA675CB2621C0EB, serialNumber=713D6BDDB988B05B1CC072EBFD3A58E7E640EA20499573AAE08DC106AC632ADD, cn=URMILA VAIBHAV JOSHI
Date: 2023.07.12 10:14:21 +05'30'

**(उर्मिला जोशी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.), मंत्रालय, मुंबई.
३. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद व नाशिक.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड व अहमदनगर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, बीड व अहमदनगर.
६. संबंधित अधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे मार्फत).
७. अवर सचिव (आस्था-२), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती, कार्यासन आस्था-३ अ, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.